मा.मंत्री (आरोग्य) यांच्याकरीता निर्लेखित वाहनांच्या ऐवजी नविन वाहन खरेदीची देयके संक्षिप्त देयकाद्वारे अदा करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः वाहन -२०१५/प्र.क्र. २७ /आरोग्य-४

जी.टी.हॉस्पिटल संकुल इमारत,मंत्रालय,मुंबई
तारीख: २८ मार्च, २०१५

वाचा

**१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.वाहन२०१४/प्र.क्र.९/१४/विनियम, दि.८मे,२०१४ व ४ ऑगस्ट,२०१४ व शुध्दीपत्रक दि.७ ऑगस्ट,२०१४.**
**२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.वाहन-२०१४/प्र.क्र.३६/१४/विनियम,दि.२२ ऑगस्ट,२०१४.**
**३) शासन निर्णय, सा.आ.वि., समक्रमांक, दि.३.०३.२०१५.**
**४) उपसंचालक आरोग्य सेवा (परिवहन), पुणे यांचे पत्र दि.४.०३.२०१५ व दि.२८.०३.२०१५.**

शासन निर्णय

मा.मंत्री (आरोग्य) महोदयांकरिता रु.२० लक्ष मर्यादेत निर्लेखित वाहनां ऐवजी मे.टोयाटो किर्लोस्कर मोटार प्रायव्हेट लिमीटेड या वाहन उत्पादक कंपनीचे इनोव्हा (युरो-४) हे वाहन खरेदी करण्यास रू.१६,१७,१४५/- एवढ्या रक्कमेस संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

वित्त विभागाने अनौपचारीक संदर्भान्वये दिलेल्या सहमतीनुसार "एक विशेष बाब" म्हणून रू.१६,१७,१४५/- (अक्षरी रूपये सोळा लक्ष सतरा हजार एकशे पंचेचाळीस मात्र ) इतकी रक्कम अदा करण्यासाठी खालील अटींच्या अधीन राहून कोषागार कार्यालयात सदर देयके संक्षिप्त देयकाद्वारे अदा करण्यासाठी या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

१) यापुर्वी संक्षिप्त देयकावर काढण्यात आलेल्या रक्कमेच्या एका प्रलंबित देयकाव्यतिरिक्त कोणतेही तपशिलवार देयक सादर करणे प्रलंबित नाही.
२) खर्च नियमित देयकाद्वारे करणे शक्य नसून त्यासाठी संक्षिप्त देयकाद्वारे रक्कम काढणे अनिवार्य असल्याची खात्री करून घेण्यात आली आहे.
३) सदर संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक विहित मुदतीत सादर करण्यात येईल.
४) या संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक विहित मुदतीत सादर करण्याची जबाबदारी उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ), पुणे यांची राहील.
५) मासिक निधी विवरणपत्रानुसार खर्च करण्यास रक्कम उपलब्ध असणे आवश्यक आहे.

२. या शासन निर्णयाद्वारे सदरचे संक्षिप्त देयक कोषागार अधिकारी, पुणे येथून आहरीत करण्यास उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१७८/१५/विनियम दि.१६.०३.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३१२२३४०५६६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shekhar Vasantrao Dhawale

Digitally signed by Shekhar Vasantrao Dhawale
DN: CN = Shekhar Vasantrao Dhawale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.04.06 17:21:46 +05'30'

**शेखर ढवळे**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक आरोग्य सेवा,मुंबई
२. उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे
३. सहसंचालक,आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), पुणे
४. सहाय्यक संचालक (लेखा व लेखापरिक्षा), आरोग्य सेवा,पुणे
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष,मुंबई.
७. महालेखापाल १- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
८. महालेखापाल १- (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
११. वित्त विभाग ( व्यय-१३/विनियम ),मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव (अर्थसंकल्प), सा.आ.वि. मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (आरोग्य-४)